राज्य व जिल्हास्तरावरील युवा पुरस्कारासाठी निधी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निवियो-२०२२/प्र.क्र.४९/क्रीयुसे -३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २९ मार्च, २०२३.

वाचा:-

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. युकयो-२०१२/प्र.क्र. ६५/क्रीयुसे-३, दिनांक १२ नोव्हेंबर, २०१३
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. निवियो-२०२२/प्र.क्र.४९/क्रीयुसे-३, दि. ०२ फेब्रुवारी, २०२३
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक,अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१६ मार्च, २०२३
४) क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्रमांक निधी वितरण/युवापुरस्कार योजना-५५६४/२०२२-२३/का-१०/८०३०, दि. १४ फेब्रुवारी, २०२३.

**प्रस्तावना : -**

महाराष्ट्र राज्यातील/जिल्ह्यातील युवांनी केलेल्या समाजहिताच्या कार्याचा गौरव व्हावा व युवा विकासाचे कार्य करण्यासाठी त्यांना प्रोत्साहन मिळावे यासाठी राज्य व जिल्हास्तरावर युवा पुरस्कार प्रतिवर्षी देण्यास शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. युकयो-२०१२/प्र.क्र.६५/क्रीयुसे-३, दिनांक १२ नोव्हेंबर, २०१३ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात प्रस्तुत उपक्रमाची अंमलबजावणी करण्याकरीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.१२५.०० लक्ष इतक्या मंजूर तरतुदीपैकी रु. ५२.५० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला असून सुधारित अंदाजाच्या मर्यादेत रू. ३५.०० लक्ष (अक्षरी रूपये पस्तीस लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्यातील/जिल्ह्यातील युवांनी केलेल्या समाजहिताच्या कार्याचा गौरव व्हावा व युवा विकासाचे कार्य करण्यासाठी त्यांना प्रोत्साहन मिळावे यासाठी राज्य व जिल्हास्तरावर युवा पुरस्कार प्रतिवर्षी देण्यासाठी अर्थसंकल्पित रु.१२५.०० लक्ष इतक्या मंजूर तरतुदीपैकी रु. ५२.५० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला असून सुधारित अंदाजाच्या मर्यादेत रु. ३५.०० लक्ष ( अक्षरी रूपये पसत्तीस लक्ष फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास व सदर निधी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च मागणी क्र. ३, २२०४ क्रीडा व युवक सेवा-१०३, (१०)(१०) युवा धोरणांतर्गत योजना, युवा पुरस्कार (कार्यक्रम) (२२०४ ५५६४) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे. तसेच, वितरीत करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

३. सदरचा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.१६/०३/२०२३ मधील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा)यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित लेखाशिर्षांतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या सुधारित अंदाजाच्या मर्यादेत निधी खर्च करण्यात येईल व सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात येईल या अटींच्या अधिन राहून सदर निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५४/१४७१, दि. २४ मार्च, २०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक -३९२/व्यय-५, दि. २७ मार्च, २०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२९१९३५३९६७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2023.03.29 19:40:00 +05'30'

**( ज्ञानेश्वर आव्हाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,
४. मा.मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१२. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
१३. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)
१४. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( संचालनालयामार्फत )
१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (संचालनालयामार्फत)
१६. वरीष्ठ कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे (संचालनालयामार्फत)
१७. निवडनस्ती, क्रीयुसे-३